**अलिबाग, जिल्हा रायगड येथे नाटयगृह बांधकामासाठी तिसऱ्या हप्त्याचे अर्थसहाय्य मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नागृबा-२०१५/प्र.क्र.८५/सां.का.१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १० जुलै, २०१७.

वाचा : १. शासन निर्णय,समक्रमांक दि.०७ सप्टेंबर, २०१६.
२. शासन निर्णय,समक्रमांक दि.२३ मे २०१७.
३. जिल्हाधिकारी तथा जिल्हादंडाधिकारी कार्यालय,रायगड-अलिबाग यांचे पत्र क्र.साप्रशा/कार्या-१/ब-४/उपयोगिताप्रमाणपत्र/२०१७, दि.२१.०६.२०१७.

प्रस्तावना :

जिल्हा मुख्यालयी नाटयगृह बांधकाम करण्यासाठी निधी मंजूर करण्याची योजना विभागाच्या दि.२९.२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये कार्यरत आहे. या योजनेनुसार पी.एन.पी. सहकारी सांस्कृतिक कला विकास मंडळ, अलिबाग या सहकारी संस्थेच्या नाटयगृह इमारतीच्या बांधकामासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दि.०७ सप्टेंबर,२०१६ अन्वये रुपये ४,७५,९३,०००/- (रुपये चार कोटी पंच्याहत्तर लक्ष त्र्याण्णव हजार फक्त) एवढया रकमेच्या अंदाजपत्रक व आराखडयास प्रशासकीय मान्यता देऊन शासकीय अर्थसहाय्याचा प्रथम हप्ता म्हणजेच रु.१.५२ कोटी वितरीत करण्यात आला. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये, शासकीय अर्थसहाय्याचा दुसरा हप्ता म्हणजेच रू.१.९० कोटी वितरीत करण्यात आला. दुसऱ्या हप्त्यापोटी वितरीत रु.१.९० कोटी अर्थसहाय्याचे उपयोगिता प्रमाणपत्र संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये,जिल्हाधिकारी, रायगड यांनी सादर केले असून सदर नाटयगृह बांधकामासाठी शासनाच्या तिसऱ्या व अंतिम हप्त्याच्या निधी वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :

आता या शासन निर्णयान्वये पी.एन.पी. सहकारी सांस्कृतिक कला विकास मंडळ, अलिबाग या सहकारी संस्थेमार्फत बांधण्यात येणाऱ्या नाटयगृह इमारतीच्या बांधकामासाठी शासकीय अर्थसहाय्याच्या १०% एवढया तिसऱ्या हप्त्याची रक्कम रु.३८,००,०००/- (रु.अडतीस लक्ष फक्त) वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) शासन निर्णय दि.०७ सप्टेंबर, २०१६ अन्वये विहित केलेल्या सर्व अटी व शर्तींचे पालन करणे पी.एन.पी. सहकारी सांस्कृतिक कला विकास मंडळ, अलिबाग या सहकारी संस्थेस व जिल्हाधिकारी, रायगड यांना बंधनकारक राहिल.
२) वितरीत करण्यात आलेल्या तिसऱ्या हप्त्याच्या अर्थसहाय्याची रक्कम खर्च केल्याचे सनदी लेखापालांनी प्रमाणित केलेले विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र तसेच कामाचे भौतिक साध्य याबाबतची माहिती नियंत्रक अधिकारी म्हणजेच जिल्हाधिकारी, रायगड यांनी सादर करावी.
३) निधी वितरण व खर्च याबाबतचा अनुपालन अहवाल जिल्हाधिकारी, रायगड यांनी शासनास पाठवावा.

२. जिल्हाधिकारी, रायगड यासाठी नियंत्रक अधिकारी राहतील व त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.झेडडी-२, २२०५ कला संस्कृती (००) १०२-कला व संस्कृती प्रचालन (०१)(०२) शासकीय प्रेक्षागृहे व सभागृहे (२२०५ १४८१) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ च्या अर्थसंकल्पिय वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.०४.२०१७ अन्वये विहित केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याने सदर निधी वितरीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०७१०१०५०५४३९२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vidya Vasant Kadam
Date: 2017.07.10 13:53:57 +05'30'

(वि.व. कदम)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
४. सर्व सन्माननीय विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५. जिल्हाधिकारी, जिल्हा रायगड
६. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), एक / दोन महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८. महालेखापाल (लेखा परीक्षा), एक / दोन महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. वित्त विभाग (व्यय-१४) मंत्रालय, मुंबई.
११. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. अध्यक्ष, पी.एन.पी. सहकारी सांस्कृतिक कला विकास मंडळ, प्रभाकर पाटील नगर, प्लॉट नं.१३, आरडीसी बँकेजवळ, अलिबाग-रायगड.
१३. अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - अर्थसंकल्प शाखेने सदर रक्कम अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करावी.
१४. निवड नस्ती, सां.का.१